# बेसी कॉलमॅन

## पहिली आफ्रिकी-अमेरिकी महिला पायलट




सैली वाकर

मराठी: अश्विनी बर्वे

# बेसी कॉलमॅन

## पहिली आफ्रिकी-अमेरिकी महिला पायलट



सैली वाकर

चित्र: जेनिस ली पोर्टर



# उडण्यासाठी तयार

## वॅक्सहाची, टेक्सास, १९०२

बेसी कॉलमॅनची बोटं हुळहुळी झाली होती, तिची पाठ दुखत होती.

१० वर्षाच्या मुलीसाठी कापूस निवडणे एक कठीण काम होते.

बेसीने आपल्या समोरची निवडण्याची गोणी बघितली. जेव्हा तिने गोणी ओढली तेव्हा गोणी जमिनीवर घसरू लागली. गोणी ही आराम करण्याची चांगली जागा आहे असे बोरीला वाटले.

घसरणाऱ्या गोणीवर हळूच प्रवास करण्याचे साहस फक्त बेसी कॉलमनच करू शकत होती.

धड़ाम! परत तिने गोणीवर पडून घेतलं.

बेसीला कापूस निवडण्याचा राग होता पण तिच्याकडे दुसरा पर्याय नव्हता. कॉलमॅन परिवार खूप गरिब होता.

आईला त्या सर्व पैशांची गरज होती जे बेसी कमावत होती.

दिवसाचा सगळ्यात चांगला काळ तो होता जेव्हा काम संपत असे.

मग बेसी गणिताचा अभ्यास करत असे.
तिचे गणितावर प्रेम होते.

बेसीने हिशोब केला की तिच्या कुटुंबाने किती कापूस निवडला. त्यांनी किती पाउंड कापूस निवडला, त्या हिशोबात त्यांना पैसे मिळत असत.

जर पैसे देणाऱ्या गोऱ्या व्यक्तीने धोका देण्याचा प्रयत्न केला तर बेसी त्याला बरोबर करण्यात बिलकुल घाबरत नसे. ती खूप साहसी होती..



कपाशीचा हंगाम समाप्त झाल्यानंतर बेसी परत शाळेत जाऊ शकल्याने खुश होती.

ती अफ्रिकी-अमेरिकी मुलांच्यासाठी असणाऱ्या एका खोलीत चालणाऱ्या शाळेत शिकायला जात असे.

१९०२ मध्ये, गोरी मुले आणि काळी मुले एका शाळेत जाऊ शकत नसत.

काळी मुलांच्या अधिकांश शाळा खूप गरीब होत्या.

बेसीच्या शाळेत खूप कमी पुस्तके होती.

कधी-कधी शिक्षकांकडचे कागद आणि पेन्सिली संपून गेलेल्या असत.

तरी पण, बेसी खूप मेहनत करत असे.

बेसी आपल्या जीवनात कापूस वेचण्याशिवाय खूप काही करू इच्छित होती.

ती जितका अधिक अभ्यास करेन तितकी तिच्या जीवनात अधिक संधी मिळण्याच्या शक्यता वाढतील.







बेसी प्रत्येक वेळी काम करत नसे. जेव्हा वाचनालयाची गाडी येई तेव्हा आई बेसीला वाचण्यासाठी पुस्तके भाड्याने घेत असे. रात्री ब्सेई ती पुस्तके जोरजोरात वाचत असे.

तिला हेरिएट टबमैनची गोष्ट वाचायला खूप आवडत असे.

टबमॅन एक साहसी काळी महिला होती!

तिने शेकडो गुलामांना स्वातंत्र मिळवून दिले.

हेरिएट टबमॅनने निश्चितपणे आपल्या जीवनात महत्वपूर्ण कामं केली होती.

वाचता-वाचता बेसीने पण आपल्या मनात ठरवलं. एक दिवस ती पण काहीतरी महत्वपूर्ण काम करेन.



१९१० मध्ये बेसी १८ वर्षाची झाली होती.

तिने ओक्लाहोमाच्या कॉलेजमध्ये अभ्यासाला सुरुवात केली, पण तिचे पैसे संपले.

मग ती टेक्सासला निघून गेली जिथे तिने पैसे कमावण्यासाठी कपडे धुतले.

कपड़े धुतांना आणि इस्त्री करतांना बेसी आपल्या भविष्याबद्दल विचार करत असे.

जर ती आपल्या जीवनात काही करू इच्छित असेल तर तिला वॅक्सहाची सोडावं लागेल.

मग तिने शिकागो मध्ये आपल्या भावांसोबत राहण्याचा निर्णय घेतला.

निश्चितच एवढे मोठे शहर तिला एका नवीन जीवनाची संधी देईल.



# उड़्ण्याचे स्वप्न

## शिकागो, १९१९

बेसीला खूप राग आला होता.

तिचा भाऊ जॉन तिला त्या नाव्ह्याच्या दुकानावरून चिडवत होता जिथे बेसी काम करत होती.

जॉन, प्रथम विश्व युद्धाच्या वेळी फ्रान्स मध्ये लढला होता.

फ्रान्सच्या महिला, शिकागोच्या काळ्या महिलांच्या पेक्षा धाडसी होत्या, असे तो म्हणत होता.

काही फ्रेंच महिला विमान चालवत असत.

एक काळी महिला विमान चालवेल अशी कल्पना कोण करणार होते?

बेसीला माहीत होते की तिने एकदा ठरवले तर मग ती काहीपण करू शकत होती.



तिला जमिनीच्या वर उडणे साहसी आणि महत्वपूर्ण वाटले.

ते काम बेसी कॉलमॅनसाठी एकदम योग्य  होते

बेसीने तेव्हाच अजून एक योग्य निर्णय घेतला की ती जॉनला चुकीचे ठरवेन.



बेसीची इच्छा होती की एखाद्या अश्वेत पायलट कडून विमान चालवण्यास शिकावे. पण शिकागोच्या आसपास एकही अश्वेत पायलट नव्हता.

बेसी एका विमानतळावरून दुसऱ्या विमानतळावर गेली आणि तिने गोऱ्या पायलटांना शिकवण्यास सांगितले.

पण प्रत्येकाने त्याला नकार दिला.

काहींनी तिला यासाठी नकार दिला कारण ती काळी होती.

दुसऱ्यांनी यासाठी नकार दिला कारण ती महिला होती.

१९१९ मध्ये विमान चालवणे एक नवीन स्वप्न होते.

१९०३ पासूनच लोकांनी विमान चालवायला सुरु झाले होते.

प्रवासासाठी विमानाचा अधिक उपयोग केला जात नसे.

अनेक जागांवर विमान इतके दुर्लभ होते की लोक त्यांना बघण्यासाठी घराच्या बाहेर् धावत येत.

त्याकाळी विमानाची पायलट एकही महिला नव्हती.

आणि एकही काळी महिला पायलट, नव्हती.





फ्रान्सला जा, रॉबर्टने बेसीला सांगितले.

फ्रान्स मध्ये गोरे लोक, काळ्या लोकांच्या बरोबर समानतेचा व्यवहार करतात.

तिथे तुला कोणी शिकवणारा शिक्षक नक्की मिळेल.

फ्रान्सचे तिकीट खूप महाग होते आणि विमान चालवायला शिकण्याची फी पण खूप होती.

त्यानंतर बेसी अधिकच व्यग्र झाली. तिने एक चांगला पगार देणारी नोकरी मिळवली. ज्यात ती मिरची विकत असे. तिने फ्रेंच शिकायला सुरुवात केली. तिने विमान चालवण्याचे स्वप्न बघितले.

मग नोव्हेंबर १९२० मध्ये बेसी एका जहाजावर चढली आणि फ्रान्सकडे रवाना झाली.

पण बेसीने हार मानली नाही.

तिने रॉबर्ट एबॉटकडे मदत मागितली.

रॉबर्ट, नाव्ह्याच्या दुकानात येणाऱ्या तिच्या ग्राहकांपैकी एक होता.

रॉबर्ट स्मार्ट आणि श्रीमंत होता.

तो आपले स्वतःचे वर्तमानपत्र "शिकागो डिफेंडर" काढत असे.



## उड्डाण करणे
## ले क्रोटॉय, फ्रान्स, १९२०

बेसीने आपल्या हाताने हळूच विमानाच्या कडेल स्पर्श केला.

तिला अजूनही विश्वास बसत नव्हता.

ती २८ वर्षाची होती आणि शेवटी तिचा उड्डाण करण्याचा पहिला धडा गिरवण्याचा दिवस आला होता.

बेसीने प्रोपेलर आणि टायरांची तपासणी केली.

तिने कपड्याने झाकलेले पंख फाटले आहेत का? आणि काही भेगा पडल्या आहेत का? याची तपासणी केली.

चांगले पायलट नेहमी उड्डाण करण्याच्या पूर्वी विमानांची तपासणी करत असत.



बेसी मागच्या कॉकपिटमध्ये चढली.

तिचा इंस्ट्रक्टर समोर बसला होता.
विमानाची मोटर फिरू लागली..

प्रोपेलर, वेगाने फर-फर करू लागला.



जसे विमानाने उड्डाण केले, थंड हवा बेसिच्या गालांना स्पर्शू लागली. शेवटी ती उडत होती.

त्या पहिल्या धड्या नंतर बेसीणे खूप मेहनत केली आणि ती सतत शिकत राहिली.

मग एक दिवस, तिने आपल्या सहकारी पायलट सहकाऱ्याला एका दुर्घटनेत मरतांना पाहिलं.

तिचं स्वप्नं तिला धोक्यात टाकत होतं. पण तिने हार मानली नाही.

तिने आपल्या विमान उडण्याच्या कौशल्यावर अधिक मेहनत घेतली.

आकाशातल्या प्रत्येक प्रवासाबरोबर बेसी अधिक साहसी होत गेली.

लवकरच ती आपली आपण एकटी उड्डाण घेऊ लागली.





शेवटी सात महिन्याच्या कष्टाचे फळ मिळाले.

जून १९२१ मध्ये, बेसीला पायलटचे लायसन्स मिळाले.

आता ती जगात कुठेही उड्डाण करू शकत होती.

ती पायलटचे लायसन्स मिळवणारी पहिली आफ्रिकी अमेरिकन महिला होती.

शेवटी तिने आपला जॉनला चुकीचे सिद्ध केले.

शेवटी बेसी काहीतरी मिळवले आणि काहीतरी नवीन करून दाखवले होते..

आता तिची घरी जाण्याची वेळ झाली होती.

आणि जगाला हे दाखवून देण्याची वेळ आली होती की बेसी कोलमॅन काय करू शकते?



## मला उडतांना बघा!

## लॉग आयलंड, न्यूयॉर्क, सप्टेंबर १९२२

बेसीने आपल्या बुटांना पॉलिश केले.

तेव्हाच एक बँड वाजू लागला..

बँडचे जॅझ संगीत, बेसीच्या मूडशी मेळ खात होते.

ती प्रथमच कोण अमेरिकी गर्दी समोर उडणार होती.

तिला आकाशात उडतांना बघण्यासाठी एक हजारांपेक्षा जास्त लोकांनी तिकीट खरेदी केले होते.



बेसी कॉकपिटमध्ये चढली आणि तिने आपल्या डोळ्यांवर चष्मा घातला.

मग तिचा सह-पायलट मागून चढला.

मॅकेनिकने इंजन सुरु केले.

जसे विमान पूर्ण मैदानावर धावले आणि मग ते जमीनवरून वर उठले तेव्हा गर्दीने ते निरखून बघितले.

१९२०च्या दशकात विमानाच्या नेहमी दुर्घटना होत असत.



प्रत्येकाला हे माहीत होते की अनुभवी पायलटकडून सुद्धा कधी कधी दुर्घटना होत असत..

ती काळी महिला पायलट सुरक्षित नेईल का?

बेसी गर्दीच्या वर उडू लागली. ती हवेत उडाली आणि मग सहजपणे खाली उतरली.

तिचे ते एक आदर्श उड्डाण होते.

लवकरच बेसीने उड्डाण करण्याच्या शिवाय अजून खूप काही करू लागली..

तिने अद्भुत स्टंट करून आपल्या प्रशंसकांना रोमांचित केले.

शिकागोमध्ये, ती इतकी खालून उडाली की गर्दीला स्वतःला वाचवावे लागले.

मग लोकांनी विमान वर आकाशात उडतांना बघितले.



अचानक, विमान वेगाने एका बाजूला वळले.

दर्शकांनी घाबरून दीर्घ श्वास घेतला.

बेसी नियंत्रण घालवून बसली होती का?

नाही! एक सेकंदासाठी सुद्धा नाही.!

बेसीने परत विमान फिरवले आणि आठची आकृतीचा आकार पूर्ण केला. (फिगर आफ ऐट)






बेसीच्या स्टंट्सला काही लोक घाबरले होते.

त्यांना वाटले की तिच्या साहसी स्टंट्समुळे बेसी आपला जीव धोक्यात घालत आहे.

पण बेसी स्वतःकडे उडणाऱ्या अभिनेत्रीच्या रुपात बघत होती.

तिचे काम लोकांचे चांगले मनोरंजन करणे होते.

तिच्यासाठी साहसी स्टंट्स करण्याचे अजून एक कारण होते. तिला पैसा कमावण्याची गरज होती.

बेसीला एक फ्लाइंग स्कूल उघडण्याची इच्छा होती.

त्यासाठी तिला विमाने खरेदी करण्यासाठी आणि त्यांना ठेवण्यासाठी एका जागेची आवश्यकता होती.त्या सगळ्या गोष्टी महाग होत्या.

गर्दीसाठी उड्डाण करत कदाचित ती त्या गोष्टी खरेदी करू शकणार होती.





बेसीला आशा होती की तिची शाळा इतर काळ्या लोकांना उडणे शिकवण्यास मदत करेन.

बेसीने आपली शाळा उघडण्यासाठी पैसे कमावण्यासाठी खूप मेहनत केली.

अधिक प्रशंसकांना जिंकण्यासाठी बेसीने चर्च आणि थिएटरांमध्ये भाषणे दिली.

ती वर्तमानपत्रातल्या पत्रकारांशी बोलली.

कधी-कधी तिने एक पायलटच्या रुपात आपल्या करियरची सच्चाई ती वाढवून–चढवून सांगत असे.

एका रिपोर्टरला तिने सांगितले की तिने युरोपच्या सहा देशांमध्ये उड्डाण केले आहे.

पण बेसीच्या उडण्याबाबत कुठेच नकली नव्हते. ती एक कुशल पायलट होती.



१९२३ मध्ये, बेसी कॅलिफोर्नियाला गेली.

तिच्या डोक्यात उड्डाण शाळेच्या योजना होत्या.

तिने आपले पहिले विमान खरेदी केले.

ते एक छोटे, सेकंड हँड विमान होते ज्याचे नाव "कर्टिस जेनी" होते.

मग तिने एक एयर-शो केला..

जशी ती नेहमी करत असे, बेसीने उड्डाण करण्याच्या आधी विमानाची तपासणी केली.

तिला सगळं काही ठीक वाटत होतं.

तिने विमानाला हवेत ३०० फुट उंच उडवलं.

पण अचानक विमानाची मोटर ठप्प झाली.

विमान जमिनीकडे येऊ लागले. हे येणे एखादे स्टंट नव्हते.

विमानाचा बेसीच्यासहित अपघात झाला.



बचाव पथकाने बेसीला दवाखान्यात नेले. तिचा एक पाय आणि काही हाडं तुटली होती.

तिच्या चेहऱ्यावर आणि हातावर कापल्याच्या खुणा होत्या.

पण तरीही ती जिवंत होती. बेसीने जवळपास तीन महिने अंथरुणावर काढले.

तिला खूप जखमा झाल्या होत्या आणि वेदनेने ती कण्हत होती.

तिच्या प्लास्टरमधल्या पायाला खाज येत होती.

सगळ्यात वाईट गोष्ट ही आहे की तिचे विमान पूर्णपणे नष्ट झाले होते.

पण बेसीने हार मानली नाही.

तिने आपल्या प्रशंसकांना दवाखान्यातून संदेश पाठवला.

“जसे मला चालायला येईल तशीच मी परत उड्डाण करायला लागेल.”

बेसीने आपलं वचन पूर्ण केलं. त्या सप्टेंबरमध्ये, ती कोलंबस, ओहियो गेली.

तिने एक विमान उधार घेतले आणि दुसरा शो केला.

खरंतर बेसी दुसऱ्यांदा उड्डाण करतांना घाबरलेली होती पण तिने ते दाखवले नाही..

तिला आकाशात उडतांना बघून दहा हजार दर्शक रोमांचित झाले.

यावेळी काहीच चुकीचे झाले नाही.



बेसीने भविष्याकडे बघितले. तिने इतर अनेक शो मध्ये उड्डाण केले. तिने पॅराशूटिंग आणि इतर काही फॅन्सी स्टंट्स पण करून बघितले.



ती कोणत्या ना कोणत्या प्रकारे आपले फ्लाइट स्कूल उघडण्यासाठी काम करत राहिली.

आणि ती सर्व रंगांच्या महिलांचे आणि पुरुषांचे विमान चालवण्याचे स्वप्न पूर्ण करेल.



# अंत के शब्द

बेसी कॉलमॅनने आपल्या राज्यात टेक्साससहित अनेक जागांवर एयर-शो चे प्रदर्शन केले. एक पायलटच्या रुपात मृत्यूवर मात करणाऱ्या स्टंट्स बरोबर ती पॅराशूटिंगपण शिकली. ती चालणाऱ्या विमानाच्या पंखावर समतोल राखत "विंग-वॉक" पण करत असे तेव्हा दुसरा पायलट विमानाची कमान सांभाळत असे. ती जिथे जाई, तिथे तिने हजारो प्रशंसकांना चकित आणि प्रेरित केले आहे..

दुःखाची गोष्ट ही की बेसी आपली सर्व स्वप्नं खरी होतांना बघायला जिवंत राहिली नाही. १९२६ मध्ये एका भयानक दुर्घटनेमध्ये तिचा मृत्यू झाला. बेसी फ्लोरिडामध्ये एक "जेनी" विमानातून पॅराशूटद्वारा उडी मारण्याची तयार करत होती. विमानाच्या नियंत्रण गियरमध्ये एक रिंच पडला आणि तो जाम बसला. पायलटने आपले नियंत्रण घालवले. मागच्या कॉकपिटमधून आपल्या सीटवरून बेसी त्याला काहीच मदत करू शकत नव्हती. विमानाचा अपघात झाला. बेसी आणि पायलट या दोघांचा मृत्यू झाला.

ती आपले फ्लाइंग स्कूल उघडण्याआधी मरण पावली, टेक्सासची ती साहसी कापूस वेचणारी मुलगी वास्तवात आपल्या जीवनात खूप काही महत्वपूर्ण करू शकली. अनुचित व्यवहार न करता पायलटचे लायसन्स मिळवणारी ती पहिली आफ्रिकी-अमेरिकी महिला होती. तिच्या कौशल्यामुळे अनेक प्रशंसकांना पायलट होण्यासाठी प्रेरित केले. आणि तिच्या. दृढ संकल्प आणि साहसामुळे सर्व वंशाच्या लोकांना आपले ध्येय प्राप्त करण्यासाठी उच्च ध्येय ठेवण्याची प्रेरणा मिळाली..

## महत्वपूर्ण तारखा

१८९२ —बेसी कॉलमॅनचा जन्म २६ जानेवारीला अटलांटा, टेक्सासमध्ये एका छोट्या खोलीत झाला.

(तिचे जन्मवर्ष नक्की माहीत नाही.)

१८९४ —परिवार वॅक्सहाची, टेक्सासला आला.

१९१० —लॅंगस्टन, ओक्लाहोमामध्ये कलर्ड एग्रीकल्चरल एंड नार्मल यूनिवर्सिटीमध्ये अध्ययन केले; पैसे संपल्यामुळे ती ख़त्म वैक्सहाचीला परत आली.

१९१५ —शिकागोला आली.

१९१७ —क्लाउड ग्लेनशी विवाह केला.

१९२० — फ्लाइट स्कूल मध्ये शिकण्यासाठी फ्रान्सला गेली.

१९२१ —पायलटचे लायसन्स मिळाले,ते मिळवणारी ती पहिली आफ्रिकी-अमेरिकी महिला होती.

१९२२ —फ्रान्समध्ये उड्डाण प्रशिक्षण; लॉन्ग आयलंड, न्यूयॉर्कमध्ये पहिला एयर-शो केला.

१९२३ —कॅलिफोर्नियामध्ये अपघात; जवळपास तीन महिने दवाखान्यात घालवले.

१९२६ —फ्लोरिडाच्या जॅक्सनविलमध्ये विमान अपघातात मृत्यू.

१९९५ —अमेरिकी पोस्टऑफिसने उड्डाणच्या इतिहासातील बेसी कॉलमॅनच्या भूमिकेचा सन्मान करत एक पोस्टाचे तिकीट प्रसिद्ध केले.

